प्रशासकीय मान्यता -
पाली,ता.सुधागड, जिल्हा-रायगड येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांचेकरिता निवासस्थान बांधण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.-सीआरक्यू-२११०/प्र.क्र.१३१/का.१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ८ फेब्रुवारी, २०११.

पहा :-१) प्रबंधक,(निरीक्षण-२) उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी/डब्ल्यु/६०४१/१९८६, दि.२१.४.२०१०,
२) जिल्हा व सत्र न्यायाधीश,रायगड-अलिबाग यांचे पत्र जा. क्र. प्रशा.७७२/सन २०१० दि.८.२.२०१०.

**शासन निर्णय** :- पाली,ता.सुधागड, जिल्हा-रायगड-अलिबाग येथे दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांचेकरिता एक निवासस्थान बांधण्याच्या **रु.१८,३६,२४३/-(रुपये अठरा लक्ष,छत्तीस हजार, दोनशे त्रेचाळीस फक्त)** इतक्या इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

रूपये

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | १४,९२,८८१ |
| २ | पाणी पुरवठा व मलनिस्सारण (८%) | १,१९,४३० |
| ३ | विद्युतीकरण (११ %) | १,६४,२१७ |
| ४ | आकस्मिक खर्च ४% | ५९,७१५ |
| | एकूण | १८,३६,२४३ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) **"काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.**

२) **" मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे."**

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-२४०/इमा-२, दि.१ ऑक्टोबर,२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय,मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-१),उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,रायगड-अलिबाग,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक,मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन,नागपूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,महाड,जि.रायगड,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,सुधागड-पाली,जि.रायगड,
जिल्हा कोषागार अधिकारी,जि. रायगड,
उप कोषागार अधिकारी,सुधागड,जि.रायगड,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,१८ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई-३२,
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.